पणन संचालनालयातील सात अस्थायी पदांना सन २०१५-१६ या वर्षाकरीता मुदतवाढ मिळणेबाबत-

# महाराष्ट्र शासन

## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सपस-२०१५/प्र.क्र.७९/ २४ स

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ३१ मार्च, २०१५

वाचा :-

1) **सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांकः राजस-१००८/प्र.क्र. ५३८/ ५ स, दि. ५ मे, २०११**
2) **सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांकः सपस- २०१४/ प्र.क्र. २ / २४ स, दि. १ फेब्रुवारी, २०१४**
3) **पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र जा.क्र.पणन-४/आस्था/अस्थायीपदे/मु.वा.(प्रतवारी)/१५/७१७, दि. १८ फेब्रुवारी, २०१५**

**शासन निर्णय :-**

पणन संचालनालयातील ७ अस्थायी पदांना दिनांक २८ फेब्रुवारी, २०१५ पर्यंत उपरोक्त वाचा (२) मधील शासन निर्णय दिनांक १ फेब्रुवारी, २०१४ नुसार मुदतवाढ देण्यात आली होती. सदर ७ अस्थायी पदांना दिनांक १ मार्च, २०१५ पासून मुदतवाढ देण्याच्या प्रस्तावाला खालील अटींच्या अधिन राहून दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६ पर्यंत शासनाची मंजूरी देण्यात येत आहे :-

1) कार्यालय प्रमुखाचे पद वगळून उर्वरित सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीकरीता रिक्त असलेली पदे वगळण्यांत यावीत.
2) अस्थायी पदे विहित पध्दतीने भरलेली असावीत.

दिनांक १ मार्च, २०१५ पासून ते दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६ पर्यंतच्या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात येणाऱ्या अस्थायी पदांचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | सह संचालक (पणन) | १ |
| २ | लेखाधिकारी | १ |
| ३ | लघुलेखक (निम्नश्रेणी) | २ |
| ४ | वाहनचालक | ३ |
| | **एकूण** | **७** |

२. उपरोक्त अटींचे पालन करण्याची जबाबदारी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

३. उपरोक्त बाबींवरील खर्च मागणी क्रमांक २४२५-सहकार-००१-संचालन व प्रशासन-००१-(०१)(०३) पणन संचालनालय (२४२५००४९) या लेखाशिर्षाखाली दाखविण्यात यावा व त्याखाली सन २०१५-१६ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३१११२४१६७५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Saguna Ganesh Thengil

Digitally signed by Saguna Ganesh Thengil
DN: CN = Saguna Ganesh Thengil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.03.31 11:34:34 +05'30'

**( सगुणा ठेंगील )**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), मुंबई,
४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
५. कार्यासन अधिकारी, ५ स / १२ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.